प्रकल्प अहवालास मान्यता देण्याबाबत.
**रामदास आठवले मागासवर्गीय कापूस उत्पादक सहकारी सूतगिरणी मर्या., दिग्रस, जि.यवतमाळ.**

# महाराष्ट्र शासन

## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**शासन निर्णय क्रमांकः प्रकल्प-१२१७/प्र.क्र.२४/टेक्स १(अ)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय ( विस्तार), मुंबई ४०० ०३२.
तारीख : ०४ सप्टेंबर, २०१७

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सुतगि १२००/प्र.क्र.१५३/टेक्स-१, दि.१३.६.२०००
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सुतगि ११२०००/प्र.क्र.१२५/टेक्स-१(अ), दि.२.८.२००३.
३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सुतगि ११०८/प्र.क्र.९१/टेक्स-१(अ), दि.३०.६.२०११
४) संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कार्यासन६(१)/सुतगि/२०५८/२०१७, दिनांक ०४.०३.२०१७
५) शासन पत्र, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.संनिस २२१७/सं.क्र.१४६/VIP/टेक्स-१(अ), दि.२०.०७.२०१७.

**प्रस्तावना :-**

रामदास आठवले मागासवर्गीय कापूस उत्पादक सहकारी सूतगिरणी मर्या., दिग्रस, जि.यवतमाळ या सूतगिरणीची बाराव्या पंचवार्षिक योजना काळात अर्थसहाय्यासाठी दि.२७.२.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निवड करण्यात आली आहे. शासनाने दिनांक ३०.६.२०११ च्या शासन निर्णयान्वये, राज्यातील सहकारी सूत गिरण्यांच्या सुधारीत प्रकल्प अहवालाची किंमत रु.६१७४.२४ लाख इतकी निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार या सुतगिरणीने महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ, मुंबई यांचेकडून २५२०० चात्यांचा सुधारीत प्रकल्प अहवाल तयार करुन संचालक वस्त्रोद्योग यांचे मार्फत शासनाच्या मंजूरीसाठी सादर केलेला आहे. संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ४ येथील दि.४.३.२०१७ च्या पत्रान्वये प्रकल्प अहवाल सुकाणू समितीच्या मंजूरीसाठी सादर केला आहे. सुकाणू समितीच्या दिनांक ०५.०७.२०१७ रोजी झालेल्या बैठकीत सदर सूतगिरणीच्या प्रकल्प अहवालात दर्शविलेल्या किंमतीबाबत चर्चा करुन बाराव्या पंचवार्षिक योजनेत नव्याने अर्थसहाय्यासाठी घेण्यात आलेल्या रामदास आठवले मागासवर्गीय कापूस उत्पादक सहकारी सूतगिरणी मर्या.,

दिग्रस, जि.यवतमाळ या सूतगिरणीच्या प्रकल्प अहवालाची एकूण रु.६१७४.२४ लाख किंमत समितीने मान्य केली. ही किंमत शासनाने दि.३०.६.२०११ च्या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या मॉडेल प्रकल्प अहवालातील किंमतीच्या मर्यादेत असल्याने, रामदास आठवले मागासवर्गीय कापूस उत्पादक सहकारी सूतगिरणी मर्या., दिग्रस, जि.यवतमाळ या सूत गिरणीच्या रु.६१७४.२४ लाख एवढ्या प्रकल्प किंमतीस मंजूरी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

शासन आता रामदास आठवले मागासवर्गीय कापूस उत्पादक सहकारी सूतगिरणी मर्या., दिग्रस, जि.यवतमाळ ही सहकारी सुतगिरणी नव्याने अर्थसहाय्यासाठी घेण्यांत आली असून प्रथमच प्रकल्प अहवाल किंमत निश्चित करण्यात येत असल्याने शासन निर्णय दि.३०.६.२०११ अन्वये निश्चित केलेल्या रु.६१७४.२४ लाख इतक्या प्रकल्प अहवाल किंमतीच्या मर्यादेत या सूत गिरणीच्या २५२०० चात्यांच्या प्रकल्पास गिरणीने त्या त्या बाबींसाठी परिच्छेद २ मधील तक्त्याप्रमाणे मंजूर कमाल मर्यादेपेक्षा जास्त होणारा खर्च गिरणी स्वनिधी उभारुन करेल या अटीवर सदर सूतगिरणीच्या रु.६१७४.२४ लाख इतक्या प्रकल्प किंमतीस खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून याद्वारे मान्यता देत आहे.

१) सूतगिरणीच्या कामासाठी कालबध्द कार्यक्रम (Time bound Program) आखून द्यावा, त्यानुसार सूतगिरणीची उभारणी विहित कालावधीत करावी.

२) सूतगिरणीचे काम कार्यक्षमपणे चालण्याच्या हेतूने सूतगिरणीच्या व्यवस्थापनावर शासनाचा कायमस्वरुपी एक अधिकारी नेमणूक करण्याचे प्रस्तावित असून त्याबाबतचा अंतिम निर्णय सूतगिरणीवर बंधनकारक राहिल.

३) शासन निर्णय दि.२४.३.१९९९ मध्ये सूतगिरणी परतफेडीबाबत दि.१०.०७.२०१७ च्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली असून सदरची सुधारणा या सूतगिरणीसाठी बंधनकारक राहिल.

४) सूतगिरणीस निधी उभा करण्यासाठी कोणती बँक कर्ज देणार आहे, त्या बँकेचे कर्ज मंजूर करण्यात येत असल्याबाबतचे पत्र सादर करावे.

५) सूतगिरणींच्या कामकाजावर व प्रकल्प उभारणीवर लक्ष देऊन त्याबाबतचा तिमाहि प्रगती अहवाल संचालक, वस्त्रोद्योग यांनी विहित विवरणपत्रांत शासनास सादर करावा.

६) सूतगिरणीचा प्रकल्प एक पथदर्शक प्रकल्प म्हणून उभा राहिल याबाबत सूतगिरणीने तसेच संचालक, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी दक्षता घ्यावी.

२. शासनाच्या विद्यमान धोरणानुसार प्रकल्पाचा वित्तीय आकृतिबंध १:१या प्रमाणात भाग भांडवल व कर्ज असा राहील. सूतगिरणीचे सभासद भाग भांडवल व शासकीय भाग भांडवल याचे प्रमाण १:९ असे राहील. त्यानुसार सूतगिरणीने पुढीलप्रमाणे निधीची उपलब्धता करावयाची आहे.

(रुपये लाखात)

| | | |
|---|---|---|
| अ) | सभासद भाग भांडवल (५%) | रु.३०८.७१ |
| ब) | शासकीय भागभांडवल (४५%) | रु.२७७८.४१ |
| क) | दीर्घ मुदती कर्ज (५०%) | रु.३०८७.१२ |
| | **एकूण** | **रु.६१७४.२४** |

सदर सूतगिरणीचा प्रकल्प किंमतीचा बाबनिहाय तरतूदीचा तपशिल खालीलप्रमाणे राहील व त्यामर्यादेत गिरणीने खर्च करणे गिरणीस बंधनकारक राहील.

(रुपये लाखात)

| **अ.क्र.** | **तपशिल** | **दिनांक ३०.६.२०११ रोजीच्या शासन निर्णयानुसार सुधारित प्रकल्प किंमत** |
|---|---|---|
| १ | जमीन व जमीन विकास | ५८.०६ |
| २ | इमारत | १२१५.३० |
| ३ | प्रकल्प व यंत्रसामुग्री | ३१०२.७८ |
| ४ | मिसलेनिअस फिक्स असेट्स | ८४५.०० |
| ५ | स्टोअर्स ॲन्ड स्पेअर्स | ६१.०० |
| ६ | उभारणी पूर्व खर्च | २०८.१६ |
| ७ | प्रोव्हीजन फॉर कॉन्टीजन्सी | २७३.७७ |
| ८ | मार्जिन मनी | ४१०.१७ |
| | **एकूण** | **६१७४.२४** |

३. सूतगिरणीने रु.६१७४.२४ लाख इतक्या किंमतीमध्ये प्रकल्पाची उभारणी पूर्ण करावी. शासनाकडून देय भागभांडवलाची रक्कम निधीच्या उपलब्धतेप्रमाणे देण्यात येईल. प्रकल्प पूर्ण करण्यासाठी मंजूर प्रकल्प किंमतीपेक्षा जास्त रक्कम लागल्यास सदरची जास्तीची रक्कम सूत गिरणीने स्वबळावर उभी करणे आवश्यक राहील. शासन या जास्तीच्या रक्कमेस मान्यता देणार नाही. तसेच अतिरिक्त होणारा खर्च सूत गिरणीला स्वत: करावा लागेल. दि.१५.६.२००६ अन्वये स्थापन केलेल्या संबंधीत सनियंत्रण समित्यांची मान्यता घ्यावी. गिरणीच्या संचालक मंडळाने गिरणीच्या खर्चावर कडक नियंत्रण ठेवावे व अनावश्यक खर्च टाळावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०९०६१६०४०५१४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vishal Vishvas Madane

Digitally signed by Vishal Vishvas Madane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-op Marketing and Textile, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bb0ed28a897fc87f69fe8807b3d9428966ce3233edb83a20c38834c19f2e3793, cn=Vishal Vishvas Madane
Date: 2017.09.06 15:54:52 +05'30'

**( विशाल मदने )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. प्रधान सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४. प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७. आयुक्त, समाजकल्याण महाराष्ट्र राज्य, पुणे
८. जिल्हाधिकारी, यवतमाळ
९. प्रादेशिक उप संचालक, वस्त्रोद्योग, नागपूर
१०. जिल्हा उप निबंधक, सहकारी संस्था, यवतमाळ
११. जिल्हा समाजकल्याण अधिकारी, यवतमाळ
१२. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ, मुंबई
१३. कार्यासन अधिकारी १६-सी / १७-सी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रतीत)
१५. अध्यक्ष, रामदास आठवले मागासवर्गीय कापूस उत्पादक सहकारी सूतगिरणी मर्या., दिग्रस, जि.यवतमाळ.
१६. निवडनस्ती.